**वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत जालना जिल्ह्यातील पूर्ण झालेल्या कामांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२०२५/प्र.क्र.४५/योजना-५**
मोती महल, २ रा मजला
चर्चगेट, मुंबई - ४०० ०२०.
दिनांक : २८ मार्च, २०२५.

**संदर्भ :-**
1) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.तांसुयो-२०२१/प्र.क्र.६३/योजना-१, दि.२०.०५.२०२२.
2) मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट राचिका क्रमांक १४८९४/२०२३ मधील दि.०७.१२.२०२३ रोजीचे आदेश.
3) सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जालना यांचे क्रमांक २९२, दि.१९.०३.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत जालना जिल्ह्यातील बाबुलतारा या ग्रामपंचायतीमधील पूर्ण झालेल्या कामाला निधी उपलब्ध करुन देण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट याचिका क्रमांक १४८९४/२०२३ मध्ये मा. न्यायालयाने दि.०७.१२.२०२३ रोजी दिलेल्या आदेशानुसार सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जालना यांनी संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १९.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार बाबुलतारा येथील पूर्ण झालेल्या ०१ कामांकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत संदर्भ क्र.०१ येथील दि.२०.०५.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये जालना जिल्ह्यातील प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांपैकी खालील तक्त्यातील नमूद पूर्ण झालेल्या कामाकरीता उर्वरित रू.६,२९,०००/- (अक्षरी रूपये सहा लक्ष एकोणतीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| शा.नि.दि. व अ.क्र. | तालुका | ग्रामपंचायत | तांडा/वस्तीचे नाव | कामाचे स्वरुप | कामाची किंमत (लक्ष) | यापूर्वी वितरीत केलेला निधी (लक्ष) | याद्वारे वितरीत करावयाचा निधी (लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २०.०५.२०२२ (६९) | परतूर | बाबुलतारा | धनगरवस्ती | सिमेंट रस्ता | १०.०० | ३.७१ | ६.२९ |
| **एकूण** | | | | | **१०.००** | **३.७१** | **६.२९** |

२. सदर निधी वितरीत करण्यासाठी उपसचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जालना यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदरहू निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जालना यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यावरील खर्च "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)" या लेखाशिर्षांतर्गत २०२४-२५ या वर्षात उपलब्ध आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०३२८१९०५४२०२३४ असा आहे. सदरहू ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.28 19:07:22 +05'30'

**(र. रा. पेटकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना, जालना.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
४. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
५. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, छ.संभाजीनगर.
६. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जालना.
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जालना.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
९. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (योजना-१)